अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१४-१५ “पाणी पुरवठा व स्वच्छता-१९६, जिल्हा परिषद / पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद वपंचायत समिती अधिनियम, १९६१ मधील कलम१८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने - (स्थानिक क्षेत्र) (०१( (०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५-१९१४)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः जिपआ-२०१५/प्र.क्र २१४ / पापु -२३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ११ मे ,२०१५

वाचा :-

१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० मार्च, २०१५

प्रस्तावना :-

सन २०१५-१६ चा अर्थसंकल्प दिनांक १८ मार्च २०१५ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला. सदर अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होऊन संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळेपर्यंतचा एप्रिल ते मे २०१५ या दोन महिन्याचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१५” मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे आता अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ दि.३० मार्च, २०१५ मध्ये प्रसिध्द करण्यात आल्याचे वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे.

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणीपुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्र..वाय-२ “२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता :- १९६, जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान :- (स्थानिक क्षेत्र) (०१) (०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठी ३६ सहाय्यक अनुदान वेतनासाठी रु.९,०८,३४,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी, आठ लक्ष, चैातीस हजार फक्त) व ३१ सहाय्यक अनुदान वेतनेत्तरसाठी रु.८,५०,०००/- (अक्षरी रुपये आठ लक्ष पन्नास हजार फक्त) असे एकूण रु.९,१६,८४,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी सोळा लक्ष, चौ-याऐंशी हजार फक्त) तरतूद करण्यात आली आहे.

.३. त्यापैकी वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार दिनांक १/४/२०१५ ते ३१/५/२०१५ या कालावधीतील आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५-१९१४ अंतर्गत ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) साठी रुपये १,५१,३९,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, एकावन्न लक्ष, एकोणचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध झाली आहे. सदर मंजूर झालेले लेखानुदान संबंधीत मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ, व नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी " २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-१९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद / पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद/ पंचायत समिती अधिनियम, १९६१, याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने - (स्थानिक क्षेत्र) : (०१) (०७) नियमित आस्थापनेवरील काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४) ", ३६ सहाय्यक अनुदान (वेतन), व ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (मागणी क्र.वाय-२) " या लेखाशिर्षाखाली रुपये ९,१६,८४,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी, सोळा लक्ष, चौ-याऐंशी हजार फक्त) इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आलेली आहे.

२. सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे दिनांक १/४/२०१५ ते ३१/५/२०१५ या कालावधीतील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी रू १,५१,३९,०००/-( एक कोटी एकावन्न लक्ष एकोणचाळीस हजार फक्त ) लेखानुदानाचे वाटप या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र-अ मधील स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्यानुसार संबंधीत मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, यांच्या अधिनस्त मंजुर करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहिल. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र-अ मधील स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधीत आहरण व संवितरण अधिका-यांनी घ्यावी.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या लेखाअनुदानातून होणारा खर्च मागणी क्र. वाय-२"पाणी पुरवठा व स्वच्छता-१९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ , च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने- (स्थानिक क्षेत्र) : (०१) (०७) नियमित आस्थापना (२२१५ १९१४)" ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून भागविण्यात यावा.

५.  सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या परिपत्रक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थसंकल्प-३,दिनांक ३० मार्च, २०१५ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१११३०४०४७१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.05.11 15:59:52 +05'30'

गौरी रा. म्हस्के
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
५. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
६. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा) ५ प्रतीसह
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा अनुज्ञेयता) ५ प्रतीसह
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१ नागपूर (लेखा परिक्षा) ५ प्रतीसह
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ नागपूर (लेखा अनुज्ञेयता) ५ प्रतीसह
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१५. मुख्य लेखा परिक्षक, सथानिक निधी लेखा, नवी मुंबई
१६. वित्त विभाग (व्यय-३ व अर्थ-१९)
१७. कार्यासन क्रमांक पापु-०४ व २० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१८. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, (५ प्रतीसह)
१९. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

**विवरणपत्र-अ**

शासन निर्णय पा.पु.व स्व.वि.क्रं जिपआ-२०१५/प्र.क्र.२१४ /पापु-२३, दिनांक ११ मे, २०१५ चे सहपत्र

" २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-१९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (स्थानिक क्षेत्र) (०१) (०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४) "

| अ. क्र. | जिल्हयाचे नांव | सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षामध्ये १ एप्रिल ते ३१ मे २०१५ या कालावधीतील मुक्त करण्यात आलेले अनुदान | | | | | लेखाशिर्ष २२१५ १९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | वेतन | प्रवास खर्च | कार्यालयीन खर्च | रकाना क्र.४ व ५ ची एकूण रक्कम | लेखाशिर्ष २२१५- १९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेली रक्कम एकूण अनुक्रमांक (३+६) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ठाणे | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| २ | रत्नागिरी | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ३ | सातारा | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ४ | सांगली | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ५ | कोल्हापूर | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ६ | जालना | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ७ | नांदेड | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ८ | अकोला | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| ९ | यवतमाळ | १५१३ | ० | ० | ० | १५१३ | ( अक्षरी पंधरा लक्ष तेरा हजार फक्त) |
| १० | नागपूर | १५२२ | ० | ० | ० | १५२२ | (अक्षरी पंधरा लक्ष बावीस हजार फक्त) |
| | एकुण | १५१३९ | ० | ० | ० | १५१३९ | (अक्षरी एक कोटी एकावन्न लक्ष एकोणचाळीस हजार ) |

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.05.11 16:00:12 +05'30'

(गौरी. रा. म्हस्के)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन